एकात्मिक बाल विकास सेवा योजना (पुरक पोषण आहार) हया केंद्र पुरस्कृत योजनेसाठी सन २०१८-१९ या वित्तीय वर्षासाठी अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदीपैकी उर्वरित २०% तरतूद वितरित व खर्च करण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१८ /प्र.क्र. २ (भाग-१) /का.५**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २४ ऑक्टोबर, २०१८

वाचा :- (१) वित्त विभाग,परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र. ६९/अर्थ-३, दिनांक २ एप्रिल,२०१८
(२) शासन निर्णय क्रमांक एबावि-२०१८ /प्र.क्र. २ (भाग-१)/का.५, दिनांक २६ एप्रिल,२०१८.

प्रस्तावना :-

महिला व बाल विकास विभागामार्फत एकात्मिक बाल विकास सेवा योजना (पुरक पोषण आहार) (लेखाशिर्ष केंद्र २२३६-१९२७ व राज्य २२३६-१९३६) ही केंद्रपुरस्कृत योजना आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई या कार्यालयाकडून राबविण्यात येत आहे. या योजनेकरीता केंद्र व राज्य हिस्स्याचे प्रमाण ५० : ५० असे ठरविण्यात आले आहे.

२. सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी पुरक पोषण आहार या कार्यक्रमासाठी केंद्र शासनाने रु.११०११०.४० लक्ष इतका APIP मंजूर केला आहे. त्यामध्ये केद्र हिस्सा रु. ५५०५५.२० लक्ष व राज्य हिस्सा रु. ५५०५५.२० लक्ष रक्कमेचा समावेश आहे.

३. या योजनेकरीता सन २०१८-१९ या वित्तीय वर्षात राज्याच्या अर्थसंकल्पात रु. ४९५.०० कोटी (केंद्र हिस्सा) व समरुप रु. ४९५.०० कोटी (राज्य हिस्सा) इतकी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आली आहे. तथापि, वित्त विभागाने त्यांच्या उपरोक्त संदर्भीय क्रमांक (१), दिनांक २ एप्रिल,२०१८ च्या परिपत्रकान्वये अर्थसंकल्पीत तरतूदीच्या ७०% तरतूद वितरीत व खर्च करण्यास दिलेल्या मंजूरीनुसार केंद्र हिस्सा रु. ३४६.५० कोटी व समरुप राज्यहिस्सा रु. ३४६.५० कोटी असे एकूण रु. ६९३.०० कोटी इतका निधी वितरीत व खर्च करण्यास दिनांक २६ एप्रिल, २०१८ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली असून सदर निधी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांना हस्तांतरीत करण्यात आला आहे.

४. सद्य:स्थितीत एकात्मिक बाल विकास सेवा योजना (पुरक पोषण आहार) (लेखाशिर्ष केंद्र २२३६-१९२७ व राज्य २२३६-१९३६ ) या योजनेकरीता सन २०१८-१९ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या तरतुदीपैकी उर्वरित २०% इतकी तरतूद वितरीत व खर्च करण्यासाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>** :-

सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी एकात्मिक बाल विकास सेवा योजना (पुरक पोषण आहार) या कार्यक्रमाखाली अर्थसंकल्पीत करण्यात आलेली तरतूदीपैकी उर्वरित केंद्र हिस्सा २०% (लेखाशिर्ष २२३६-१९२७ ) रु. ९९.०० कोटी व समरुप राज्य हिस्सा २०% (लेखाशिर्ष २२३६-१९३६) रु.९९.०० कोटी असे एकूण रु. १९८.०० कोटी (अक्षरी रुपये एकशे अठ्यान्नव कोटी फक्त) इतकी तरतूद आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांना वितरीत करण्यास व खर्च करण्यास शासन मान्यता देत आहे.

२. या शासन निर्णयान्वये पुरक पोषण आहार कार्यक्रमासाठी उपरोक्तप्रमाणे उपलब्ध करुन देण्यात आलेला एकूण रु. १९८.०० कोटी इतका निधी हा गरम ताजा आहार व THR यासाठी समप्रमाणात वितरीत करण्याची दक्षता आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी घ्यावी.

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१८/प्र.क्र. ६९/अर्थ-३, दिनांक २ एप्रिल, २०१८ च्या परिपत्रकान्वये निर्गमीत केलेल्या सूचनांनुसार तसेच वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्रमांक **२२५** /व्यय-६, दिनांक **२३.१०.२०१८** नुसार देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१०२४१७२२१५६४३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, serialNumber=4ca059ab7b8d64aaf749fe58e0a714a015f521cb28fd2204e49a4d81f12a5745, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2018.10.24 17:28:08 +05'30'

**( ला. रा. गुजर )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे उप मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. मंत्री/राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. विरोधी पक्ष नेता (विधानसभा/विधानपरिषद), विधानभवन,मुंबई.
५) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे स्वीय सहाय्य, मंत्रालय, मुंबई-३२
६) सचिव (महिला व बालविकास विभाग), मंत्रालय, मुंबई.
७) आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई.
९) सर्व जिल्हाधिकारी.
१०) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.

११) सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास.
१२) सर्व महिला व बाल विकास अधिकारी, (जिल्हा परिषद).
१३) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (नागरी/ग्रामीण/आदिवासी) प्रकल्प.
१४) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
१५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी मुंबई
१७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१८) कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (का.१४७२)/ वित्त विभाग (व्यय-६) मंत्रालय, मुंबई
१९) कक्ष अधिकारी (का-४) महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

यांना कळविण्यात येते की, त्यांनी रु.१९८.०० कोटी इतका निधी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांना BDS प्रणालीवर निधी वितरीत करावा.

२०) निवड नस्ती (कार्यासन-५), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.